**सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता संस्था/शाळांची निवड करण्याबाबत.**

**अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नानिशा-२०१६/प्र.क्र.२८०/का.१२**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ जून, २०१७.

**वाचा -**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.३८७/का-१२, दि.२७.०६.२०१६.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र नानिशा-२०१६/प्र.क्र.२८०/का.१२, दि.२९.०५.२०१७.
४) शासन पत्र क्र.नानिशा-२०१६/प्र.क्र.२८०/का-१२, दि.१२.०६.२०१७ अन्वये निर्गमित सचिव स्तरीय समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबतची योजना संदर्भ क्र. १ येथील दि.२८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात राबविण्यात येत आहे. सदर योजना अंमलबजावणीमध्ये सुसूत्रता आणण्याकरिता शाळेमध्ये उपलब्ध शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा आणि त्याच्या दर्जानुसार गुणांकन निश्चित करून प्राप्त गुणांकनानुसार शाळांची निवड करणे व शाळांना द्यावयाचे शुल्क निर्धारीत करण्याकरिता संदर्भ क्र. २ येथील दि.२७.०६.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार धोरण ठरविण्यात आलेले आहे. तसेच सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण घेत असलेल्या इतर विद्यार्थ्यांसमवेत योजनेंतर्गत प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती अधिक चांगली होण्याच्या दृष्टीने सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता १ ली व इयत्ता २ री या वर्गामध्येच प्रवेश देण्याबाबत संदर्भ क्र. ३ येथील दि.२९.०५.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

उपरोक्त तरतूदीस अनुसरून नामांकित योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष सन २०१७-१८ करिता अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्याच्या अनुषंगाने योजनेकरिता विकसित करण्यात आलेल्या ऑनलाईन प्रणालीमार्फत (https://namankit.mahaonline.gov.in) प्राप्त नवीन शाळांचे अर्ज तसेच सदर योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या जुन्या शाळांमार्फत प्राप्त संमतीपत्र यास अनुसरून संबंधित प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी शासनास ऑनलाईन प्रस्ताव सादर केले आहेत. सदर प्रस्तावाबाबत सचिव स्तरीय समितीमध्ये प्राप्त

मान्यतेस अनुसरून नामांकित योजनेंतर्गत संस्था/शाळांची निवड करणे व अशा शाळांमध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेशित करण्यास मंजूरी देण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षाकरिता अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत विहित निकष पूर्ण करीत असलेल्या अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील खालीलप्रमाणे नमूद केलेल्या संस्था/ शाळांची निवड करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून सदर शाळांमध्ये मंजूर करण्यात येत असलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीचे पात्रताधारक विद्यार्थी प्रवेशित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षाकरिता नामांकित योजनेंतर्गत **नवीन शाळांमार्फत** ऑनलाईन प्रणालीमार्फत प्राप्त अर्जास अनुसरून खालील शाळांची निवड करण्यात येत असून संबंधित शाळेसमोर दर्शविलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता | प्रवेशित करावयाची विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती उमाबाई बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गोंदिया. | प्रोग्रेसीव्ह कॉन्व्हेंट, गौतम नगर, सिव्हील लाईन, गोंदिया. | ५० |
| २ | श्रीमती उमाबाई बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गोंदिया | प्रोग्रेसीव्ह इंटरनॅशनल स्कूल, पंगोली रोड, चुलोद, जि. गोंदिया. | ५० |
| ३ | स्व. श्री. राजसिंग डुंगरपूरा मेमोरीयल फाऊंडेशन, नागपूर. | इनोव्हेटीव माईन्ड स्कूल ऑफ एक्सीलन्स, तळेगांव, ता.आष्टी, जि.वर्धा. | ५० |
| **एकूण** | | | **१५०** |

३. नामांकित योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या **जुन्या शाळांमार्फत** ऑनलाईन प्रणालीमार्फत सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून सन २०१७-१८ या चालू शैक्षणिक वर्षामध्ये नवीन विद्यार्थी प्रवेशित करण्यास खालील शाळांची निवड करण्यात येत असून संबंधित शाळेसमोर दर्शविलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीचे नवीन विद्यार्थी प्रवेशित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता | प्रवेशित करावयाची विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| १ | पोद्दार एज्यूकेशन ट्रस्ट, परेल, मुंबई. | पोद्दार इंटरनॅशनल स्कूल, कार्धा, भंडारा. **(डे बोर्डींग)** | ५० |
| २ | इन्फंट जिजस पब्लीक स्कूल, राजुरा, जि.चंद्रपूर. | इन्फंट जिजस इंग्लीश पब्लीक हायस्कूल, राजूरा, जि.चंद्रपूर. | ५० |
| ३ | स्वामी विवेकानंद शिक्षण संस्था, भद्रावती, जि.नागपूर. | फेअरीलॅन्ड स्कुल, भद्रावती, जि.चंद्रपूर. | ५० |
| ४ | समिधा सेवा संस्था, नागभिड, ता.नागभिड, जि.चंद्रपूर. | ट्विंकल इग्लीश स्कूल, नागभिड, जि.चंद्रपूर. | २० |
| ५ | पोद्दार एज्यूकेशन ट्रस्ट, परेल, मुंबई. | पोद्दार इंटरनॅशनल स्कूल, गोंदिया. **(डे बोर्डींग)** | ४० |
| ६ | श्रीकृष्ण बहुउद्देशिय समिती आरमोरी, जि.गडचिरोली. | पॅराडाईज इंग्लिश स्कूल, आरमोरी, जि.गडचिरोली. | ५० |
| ७ | विद्याप्रबोधिनी बहुउद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर. | सेंट्रल प्रोव्हिन्शीयल स्कूल, रामेश्वरी, जि.नागपूर. | ६० |
| ८ | ज्ञानदिप मल्टीपर्पज एज्युकेशन सोसायटी, रामटेक, जि.नागपूर. | ज्ञानदीप कॉन्व्हेंट ॲन्ड जुनियर कॉलेज, शितलवाडी, रामटेक, जि.नागपूर. | ५० |
| ९ | पोद्दार एज्यूकेशन ट्रस्ट, परेल, मुंबई. | पोद्दार इंटरनॅशनल स्कूल, नागपूर. **(डे बोर्डींग)** | ७० |
| १० | श्री. बालाश्री बहुउद्देशिय शिक्षण संस्था, नागपूर. | राय इंग्लिश स्कूल व ज्युनियर कॉलेज, गाडगेनगर, नागपूर. | ५० |
| ११ | श्री. बालाजी शिक्षण संस्था, बुटीबोरी, नागपूर. | श्री दत्त विद्यामंदीर, बुटीबोरी, जि. नागपूर. | ५० |
| १२ | महिला विकास संस्था, वर्धा. | स्कूल ऑफ ब्रिलीयंट, नागलवाडी, वर्धा. | ५० |
| **एकूण** | | | **५९०** |

४. नामांकित योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या **जुन्या शाळांमार्फत** ऑनलाईन प्रणालीमार्फत सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून सन २०१७-१८ या चालू शैक्षणिक वर्षामध्ये खालील शाळांमध्ये **नवीन विद्यार्थी प्रवेशित न करण्याबाबत** निर्णय घेण्यात येत आहे. तथापि, सदर शाळांमध्ये यापूर्वी प्रवेशित असलेले विद्यार्थ्यांचे प्रवेश कायम ठेवण्यात (Continue) यावेत :-

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| १ | जय बजरंग व्यायाम प्रसारक मंडळ, सिरोंचा, जि. गडचिरोली | ज्ञानदिप इंग्लीश मिडीयम स्कूल, सिरोंचा, जि.गडचिरोली. |
| २ | स्व. श्री. मल्लाजी आत्राम बहुउद्देशीय संस्था, आलापल्ली जि. गडचिरोली. | ग्लोबल मिडीया केरला मॉडेल इंग्लीश मिडीयम स्कूल, आलापल्ली, जि.गडचिरोली. |
| ३ | श्रीराम बहुउद्देशीय शिक्षण संस्था, आलापल्ली, ता. अहेरी जि. गडचिरोली. | ग्रीन लँड इंग्लीश मिडीयम स्कुल, आलापल्ली, ता. अहेरी. |
| ४ | श्री. दत्ता मेघे बाल कल्याण शिक्षण संस्था, वर्धा. | स्कूल ऑफ स्कॉलर्स, सावंगी (मेघे) वर्धा ता.जि.वर्धा |
| ५ | विद्यानिकेतन शिक्षण संस्था सिंदी रेल्वे ता.सेलू, जि. वर्धा. | गुंज कॉन्व्हेंट, सिंदी रेल्वे, ता. सेलू, जि. वर्धा. |
| ६ | सेमाना विद्या व वनविकास प्रशिक्षण मंडळ, गडचिरोली जि. गडचिरोली | देवयानी इंटरनॅशनल स्कूल सिंदेवाही ता. सिंदेवाही जि. चंद्रपूर. |
| ७ | सरस्वती बहुउदेशीय शिक्षण प्रसारक मंडळ, बल्लारपूर, जि.चंद्रपूर. | गुरुनानक पब्लिक माध्यमिक शाळा, बल्लारपूर, जि.चंद्रपूर. |
| ८ | तेरा प्रेम चर्च सोसायटी, वरुर रोड, ता.राजूरा, जि.चंद्रपूर. | लुअर्माना विद्यामंदीर, वरुर रोड, राजूरा, जि.चंद्रपूर. |
| ९ | सर्च फाऊंडेशन, चंद्रपूर. | स्कालर्स सर्च ॲकॅडमी, कोरपना, जि. चंद्रपूर. |
| १० | कै. बापूजी मामुलकर पाटील स्मृती प्रतिष्ठाण, राजूरा, जि.चंद्रपूर. | सोनिया गांधी इंग्लिश मिडीयम पब्लिक स्कूल, राजुरा, जि.चंद्रपूर. |
| ११ | एकात्मता शिक्षण संस्था, ब्रम्हपूरी, जि.चंद्रपूर. | हिंदू ज्ञान मंदिर, गजरीवार्ड, ब्रम्हपूरी, जि.चंद्रपूर. |
| १२ | सतोज बहुउद्देशीय शिक्षण संस्था, कुडवा, जि.गोंदिया. | ॲक्यूट पब्लिक स्कूल, पुटंगीकला, जि.गोंदिया. |
| १३ | श्री. गुरुदेव आदिवासी शिक्षण प्रसारक मंडळ, गोंविंदपूर, ता. गोरेगांव. | किरसान इंटरनॅशनल पब्लीक स्कूल, गनखैरा, ता. गोरेगांव, जि. गोदिया. |
| १४ | पवन शिक्षण संस्था, गोंदिया, जि. गोंदिया. | लिटील फ्लावर्स स्कूल, गोंदिया. |
| १५ | आदिवासी शैक्षणिक संशोधन संस्था, सडक अर्जुनी, गोंदिया. | एस. चंद्रा पब्लीक स्कूल, सडक अर्जुनी जि. गोंदिया. |
| १६ | सातपुडा एज्युकेशन सोसायटी, हनुमान नगर, नागपूर. | रॉयल गोंडवाना पब्लिक स्कूल, नागपूर **(डे बोर्डींग)** |
| १७ | मागासवर्गीय बहुउद्देशीय संस्था, रेगेपाल कोहळे, ता. लाखनी, जि. भंडारा. | पूर्ती पब्लीक स्कूल, सालेकसा, जि. गोंदिया. |

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| १८ | महेश विद्या प्रसारक शिक्षण संस्था, नागपूर. | आदर्श संस्कार विद्यालय ॲन्ड ज्युनीअर कॉलेज, श्रीकृष्णनगर, नंदनवन, नागपूर. |
| १९ | राधास्वामी विविध शैक्षणिक संस्था, नागपूर. | आदर्श संस्कार विद्यालय, पिंपळा, हुडकेश्वर रोड, नागपूर. |
| २० | प्रगतीशील बहुउद्देशीय संस्था, वाशिम. | एंजल्स पॅराडाईज इंग्लिश मिडीयम स्कूल, केळझर, ता. सेलू जि. वर्धा. |
| २१ | सेट्रल हिंदू मिलीटरी एज्यूकेशन सोसायटी, नाशिक. | भोसला मिलिटरी स्कूल, चक्की खापा, नागपूर. |
| २२ | नवजीवन संस्था, नागपूर. | डॉ. टी. एस. विलकिन्सन मेमोरियल हायस्कूल, गोंधणी रोड, नागपूर. |
| २३ | एस.जी.आर.सन्स एज्यूकेशन फाऊंडेशन, नागपूर. | जी. एच. रायसोनी स्कूल, सुकळी हिंगणा, नागपूर. (CBSE) **(डे बोर्डींग)** |
| २४ | एस.जी.आर.सन्स एज्यूकेशन फाऊंडेशन, नागपूर. | जी. एच. रायसोनी स्कूल, अंबाझरी, नागपूर. (SSC) **(डे बोर्डींग)** |
| २५ | डब्ल्यू.सी.एल. कामगार बहुउद्देशीय शिक्षण संस्था, पाटनसाबंगी, ता. सावनेर, जि.नागपूर. | हंसकृपा इंग्लिश उच्च प्रायमरी सेकंडरी ॲन्ड ज्युनियर कॉलेज, झिंगाबाई टाकळी, नागपूर. |
| २६ | राष्ट्रीय युवा उदय संस्था, नागपूर. | स्व. राजीव गांधी मेमोरीयल इंग्लीश स्कूल, कारंजा (घा.), जि. वर्धा. |
| २७ | महारीजनल बोर्ड ऑफ एज्युकेशन ॲन्ड द चर्च ऑफ नॉर्थ इंडिया, नागपूर. | सेंट उर्त्सुला गर्ल्स हायस्कूल, सिव्हील लाईन्स, नागपूर. |
| २८ | भगवंतराव मेमोरिअल शिक्षण संस्था, अहेरी जि. गडचिरोली. | गोंडवाना सैनिकी विद्यालय, गडचिरोली. |
| २९ | स्नेहा महिला विकास संस्था, नागपूर. | तुली पब्लीक स्कूल, नागपूर. |

५. नामांकित योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या काही शाळांमध्ये योजनेकरिता विहित केलेल्या आवश्यक सोयी सुविधांबाबत त्रुटी आढळून आल्याने तसेच योजनेंतर्गत प्रवेशित विद्यार्थ्यांना असमाधानकारक वागणूक देत असल्याबाबत प्राप्त तक्रारीस अनुसरून खालील शाळांची नामांकित **योजनेंतर्गतची मान्यता रद्द** (Cancelled) करण्याबाबत निर्णय घेण्यात येत आहे.प्रकरणी अशा शाळांमध्ये नामांकित योजनेंतर्गत यापूर्वी प्रवेशित केलेल्या व शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांना विहीत अटी व शर्तीचे पालन करुन इतरत्र समायोजित करण्यात यावे:-

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| १ | क्रांती शिक्षण संस्था, कोंडा कोसरा, जि.भंडारा. | मदर तेरेसा पब्लिक स्कूल, कोंढा कोसरा जि.भंडारा. |

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| २ | गणेश ग्रामीण शिक्षण संस्था, गोंदिया जि.गोंदिया. | डॉ. श्रीकांत जिचकार पब्लिक स्कूल, किंडगीपार, ता.जि. गोंदिया. |
| ३ | श्री. जगदंबा मागासवर्गीय शिक्षण संस्था, बुटीबोरी, जि. वर्धा. | होलीक्रॉस कान्व्हेंट ॲन्ड हायस्कूल, बुटीबोरी, जि. नागपूर. |
| ४ | सरस्वती शिक्षण प्रसारक मंडळ, गडचिरोली. | कुथे पाटील कॉन्व्हेंट, देसाईगंज (वडसा), जि.गडचिरोली. |

**६. नामांकित शाळेत प्रवेश देताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे :-**

I. संबंधित संस्था/शाळा मार्फत शासनाला सादर केलेल्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे सर्व सोयी सुविधा देण्यास तयार आहेत, याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी खातरजमा करावी व संस्थेकडून तसे हमीपत्र घ्यावे.

II. संस्था/शाळेमार्फत आदिवासी विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु करणे अपेक्षित नाही, शाळेमध्ये सुरु असलेल्या नियमित तुकडी/वर्गामध्येच इतर विद्यार्थ्यांसमवेत योजनेंतर्गत प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिक्षण देणे बंधनकारक राहील.

III. सदर योजनेंतर्गत शासनाने मान्यता दिलेल्या शाळांमध्येच आणि संबंधित शाळेकरिता मंजूर केलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेतच अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्याबाबत अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी दक्षता घ्यावी.

IV. योजनेच्या मूळ तरतूदीनुसार कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रू. १ लाख एवढ्या कमाल मर्यादेत असणाऱ्या पाल्यांनाच सदर योजनेचा लाभ देण्यात यावा.

V. प्रकल्प अधिकारी यांनी विद्यार्थी प्रवेशित करताना जवळच्या शाळेमध्ये तसेच संबंधित प्रकल्पातील निवड करण्यात आलेल्या शाळांना प्राधान्य देऊन विद्यार्थी प्रवेशाची प्रक्रिया तात्काळ पूर्ण करावी.

VI. एखाद्या प्रकल्प कार्यक्षेत्रातील निवड करण्यात आलेल्या शाळा व त्यामध्ये मंजूर विद्यार्थी संख्या यापेक्षा योजनेंतर्गत प्रवेशाकरिता प्राप्त अर्जांची संख्या जास्त असल्यास जवळच्या प्रकल्पामधील निवड करण्यात आलेल्या शाळेमध्ये विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा तथापि, असे करत असताना अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या कार्यक्षेत्राबाहेरील प्रकल्पातील विद्यार्थी प्रवेशित होणार नाहीत याची खातरजमा करावी. याबाबतचे पर्यवेक्षण अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावे.

VII. सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांच्या संस्थाचालक/ मुख्याध्यापका यांच्या समवेत अपर आयुक्त यांनी शैक्षणिक वर्षाच्या प्रथम व द्वितीय सत्रामध्ये बैठक घेऊन प्रवेशित विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती व त्यांना पुरविण्यात येणाऱ्या सुविधांबाबत आढावा घ्यावा.

VIII. नामांकित योजनेंतर्गत शाळेची निवड झाल्यानंतर पहिल्या सत्रात तसेच द्वितीय सत्रात संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी नामांकित शाळांना व्यक्तीश: भेट देऊन त्याबाबतचा अहवाल अपर आयुक्त, आदिवासी विकास; आयुक्त, आदिवासी विकास यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

IX. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९; आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र नानिशा-२०१५/ प्र.क्र.३८७/का.१२, दि.२७.०६.२०१६ आणि आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र नानिशा-२०१६/प्र.क्र.२८०/का-१२, दि.२९.०५.२०१७ मधील विहित तरतूदींचे काटेकोरपणे पालन करावे.

X. सन २०१७-१८ या चालू शैक्षणिक वर्षापासून योजनेंतर्गत नवीन विद्यार्थ्यांना इयत्ता १ ली व इयत्ता २ री या सुरूवातीच्या टप्प्यामध्येच प्रवेश देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

XI. सदर शासन निर्णयानुसार नामांकित योजनेंतर्गत मान्यता रद्द करण्यात आलेल्या शाळांमधील विद्यार्थी तसेच शासकीय इंग्रजी माध्यमाच्या श्रेणीवाढ नसलेल्या शाळांमधील विद्यार्थ्यांना इतरत्र समायोजित करण्यात यावे. असे समायोजन करताना विभागाच्या एकलव्य मॉडेल रेसिडेन्शियल शाळा तसेच इंग्रजी माध्यमाच्या शासकीय आश्रमशाळांमध्ये रिक्त असलेल्या जागांवर प्रथम प्राध्यानाने प्रवेश देण्याबाबत कार्यवाही करावी. तद्नंतर सदर शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या इतर नामांकित शाळांमध्ये मंजूर विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अशा विद्यार्थ्यांचे समायोजन करण्यात यावे. तसेच सदर शासन निर्णयान्वये मंजूर नामांकित शाळांमध्ये मंजूर विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत समायोजन करणे शक्य नसल्यास याव्यतिरिक्त समायोजनाच्या प्रस्तावास शासनाची मान्यता घेण्यात यावी.

XII. नामांकित योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या नामांकित शाळेमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना ज्या इयत्तेत विद्यार्थी प्रवेशित करावयाचे आहेत, अशा इयत्तेत संबंधित शाळेमध्ये नामांकित योजनेव्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थी (Non-namankit students) संख्येच्या समप्रमाणाच्या कमाल मर्यादेत राहतील याची दक्षता घेण्यात यावी. (नामांकित योजनेंतर्गत प्रवेशित विद्यार्थी कमाल ५० टक्के : योजनेव्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थी किमान ५० टक्के )

७. ज्या नामांकित संस्थेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांस प्रवेश देण्यात येणार आहे, त्या संस्थेबरोबर संबंधित प्रकल्प अधिका-यांनी करारनामा करावा. सदर करारामध्ये नामांकित योजनेंतर्गत अनुसचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात आलेल्या वर्गापासून इयत्ता १२ वी पर्यंत त्यांचे शिक्षण, आरोग्य, सुरक्षा, निवास, आहार व अन्य विहीत सोयी सुविधा पुरविण्याबाबत बाबींचा समावेश करण्यात यावा. तसेच नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या सर्व नामांकित शाळांचे प्रत्येक वर्षी नवीन शैक्षणिक वर्ष सुरू होण्यापूर्वी योजनेकरिता विकसित करण्यात आलेल्या ऑनलाईन प्रणालीवर गुणांकन करण्यात येईल व आवश्यक विहीत शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा यामध्ये निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये त्रुटी आढळून आल्यास किंवा विहीत गुणांकनानुसार शाळा अपात्र ठरल्यास संबंधित शाळेची नामांकित योजनेंतर्गतची मान्यता रद्द करून

प्रवेशित करण्यात आलेले अनुसूचित जमातीचे विद्यार्थी इतरत्र समायोजित करण्यात येतील, याचा देखील करारनाम्यात समावेश असावा.

नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांमार्फत बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार, अधिनियम, २००९ व त्याअंतर्गत केलेले व केले जाणारे सर्व नियमांची / तरतूदींची तसेच इयत्ता १ ली मध्ये शाळा प्रवेशासाठी बालकाच्या किमान वयाबाबत शिक्षण विभागाने निश्चित केलेल्या तरतूदीचे पालन करणे आवश्यक आहे.

८. सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित प्रकल्प अधिकारी करतील तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास योजनेचे "पर्यवेक्षकीय अधिकारी" म्हणून व आयुक्त, आदिवासी विकास नाशिक हे "नियंत्रक अधिकारी" म्हणून जबाबदारी पार पाडतील.

९. सदर योजनेसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

" मागणी क्र. टी- ५
२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-
पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना-जनजाती क्षेत्र उपयोजना-
०२- अनुसूचित जमातीचे कल्याण
७९६,जनजाती क्षेत्र उपयोजना- राज्य योजनांतर्गत योजना
(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
(०२) (२९)- अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे.
(२२२५ सी-९९९) ३१ " सहायक अनुदाने (वेतनेतर) "

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२९११३००७५४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarrao Aute
Date: 2017.06.29 11:29:13 +05'30'

**( रविंद्र औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
३) मा.मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, (वित्त विभाग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

६) प्रधान सचिव, (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव (आदिवासी विकास), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
९) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१०) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/अमरावती/ठाणे.
११) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१२) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१४) सर्व संबंधित संस्था/शाळा. (संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)
१५) सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती का-१२.